लाचें बंड आहे, हें प्रसिद्ध करण्या विषयीं त्याणें श्रमाची किंवा पैसा खर्चा याची कमती केली नाहीं. त्या पोराचे पक्षास कोण कोण अनुकूळ आहेत हें शोधून काढायाचाही त्याचा उद्योग चालिला होता. या कामा करितां त्याणें सर्व फ्लांडर्स देशांत आपले गुप्त दूत पाठविले; आणि शत्रूंचा पक्षाचे जे कोणी आढळले त्यांस पुष्कळ लांच देऊन आपले जवळ आणिलें. त्यांत सर राबर्ट क्लिफोर्ड त्याचे पक्षास अनुकूळ होऊन फार उपयोगास पडला; आणि त्यावर राजानें बहुत विश्वास ठेविला. त्यापासून पर्किनाचीं सर्व जन्म कर्में हेनरी राजास समजलीं; आणि त्याचें साहित्य करणारे जे होते त्यांचीही नावें कळलीं. राजास या गोष्टी समजल्यामुळें हर्ष झाला; परंतु त्याचें दूतांवर जितका त्याणें विशेष भरंवसा

सा ठेविला, तितका त्यांचा त्यास पुढें संताप आला.

त्या जवळ जे होते त्यांचा निरुपकारीपणा पाहून प्रथम त्यास कोप आला; परंतु चांगला समय येई पर्यंत आपला राग लपवून त्याणें तेव्हांच फिझवाल्टर, मौंतफर्ड, थ्वेट्स, विलियमडानबरी, राबर्ट रातक्लीफ, टामसकेसफेनर, आणि टामस आस्तवूड या सर्वांस धरून कैदेंत ठेवून सरकार गुन्हेगारीचें शासन ठरविलें. मौंतफोर्ड, रातक्लीफ आणि डानबरी यांचा लागलाच शिरछेद करून बाकीचांस सोडिलें.

या रीतीनें इंग्लंडांत आशेची निराशा झाल्यानंतर तो मुलगा आपले दैवाची परीक्षा पहायास स्काटलंडांत गेला. इंग्लंडांतले पेक्षें तेथें त्याचें दैव अनुकूळ असें दिसलें. तेथील राजा चवथा

जेम्स

जेम्स, त्याणें तो येतांच मोठा त्याचा सत्कार केला; व त्याचे जन्म कर्माचा सर्व वृत्तांत वास्तवीक मानिला. त्याचा विश्वास त्या गोष्टीवर इतका बसला कीं, आपले जवळचे नात्याची हंत्लीचे अर्लाची मुलगी क्याथेरीन गार्डन ह्मणून होती, त्याशीं तिशीं लग्न करून दिलें. ती बायको स्वरूपानें सुंदर आणि गुणी होती. इतका उपकार करूनही संतुष्ट न होतां त्या राजानें त्या मुलास इंग्लंडाचे तख्तावर बसवायाची प्रतिज्ञा केली. त्याचा असें मनांत होतें कीं, पर्किन इंग्लंडांत गेला ह्मणजे लागलेच यार्कांचे संस्थानोचे जे इष्ट आहेत, ते येऊन त्यास मिळतील. या भरंवशावर तो त्या मुलास घेऊन इंग्लंडांत जात असतां, जेथें तेथें जाहीरनामें लावीत असे; परंतु पर्किनाचे पक्षाची बहुत वेळ निराशा झाल्यामुळें लोकांचें मन

त्या

त्या वरून उतरलें होतें; ह्मणून कोणी येऊन त्यास भिळाला नाहीं. हें त्यास मोठें वाईट वाटलें.

०स० ४९७ या रीतीनें त्या पर्किनास स्काट्लंड् सुटलें; आणि फ्लेमिश लोकही त्याच्या विशेष आदर करीतनाअसें झालें; कारण त्यांची मसलत इंग्लिशांशीं तह करायाची होती ह्मणून. असें झाल्यावर त्याणें अयर्लंडांतले आरण्याच्या आश्रय करून आपला प्रयत्न पुढें चालवावा असा निश्चय केला. त्याचानें निरुद्योगी रहावेना, ह्मणून हर्न, स्केल्टन, आणि आस्त्ली या नांवाचे तीन मोडलेले व्यापारी त्यास येऊन भिळाले होते त्यांशीं मसलत केली; आणि त्यांचा बुद्धीस लागोन कार्न्वाल प्रांतांतले लोकांची आपल्यावर प्रीति आहे कीं नाहीं, हें पहायाचा निश्चय केला. मग तो कार्न्वाल

प्रांतांतले

प्रांतांतले बादमिन शहरास गेला, तेथे लागलेंच [illegible] हजार लोक त्याचे अरीपटक्याजवळ येऊन हजीर झाले. असा किंचित् भाग्योदय दिसूं लागला, तेणेंकरून चढून जाऊन त्याणें आपल्यास इंग्लंडाचा राजा चतुर्थ रिचर्ड असा किताब ठेविला; आणि आपले पक्षास मिळालेले लोकांची हिंमत खचूं नये ह्मणून त्याणें त्यांस एग्झिटर शहरचे दरवाजांजवळ नेलें. तेथील लोकांनीं त्यास आंत न घ्यायाचा आग्रह धरिला; आणि धडाईनें आंत शिराया पुरला त्याजवळ दारूगोळाही नव्हता, ह्मणून तो तेथील वेढा उठवून टांटन शहरास गेला. त्याजवळ त्या वेळेस लोक सात हजार जमले; व ते सर्व त्याचा करितां मरून खर्च व्हायास तयार होते; परंतु त्याचे हृदयानेंच तेव्हां त्यास ठकविलें. तें असें.. आ-

पले

पळे पारिपत्या करितां राजा हेनरी निघोन येतो आहे, असें समजतांच त्याणें लढाई करितां सैन्य तयार करावें तें न करितां तो त्यांस नकळत पळून गेला; आणि न्युफारेष्ट प्रांतांत बालियूचा मठांत जाऊन राहिला. त्याजवळचे बिचारे लोक सहज राजाचे हातीं सांपडले; असें असतांही, त्याणें त्यांस क्षमा करून सोडून दिले. मुख्य मुख्य जे कारणीभूत होते त्यांचें मात्र यथायुक्त शासन केलें. त्या काळीं राजा हेनरीनें आपले कितिएक लोकांबरोबर पर्किनास निरोप सांगून पाठविला कीं, तूं आह्मास शरण ये, आणि आपली सगळी लबाडी कबूल हो, ह्मणजे मी तुला क्षमा करीन. तो पर्किन त्यावेळेस मोठ्या संकटांत होता, ह्मणून त्याणें लागलेंच राजाचें सांगणें मान्य केलें; आणि ती धर्मशाळा सोडून निघाला. राजाचे

ज्याचे मनांत त्यास पहावेंसें वाटलें ह्मणून, लंडन शहराचे रस्त्यांतून थट्टेचे समारंभानें लोक चेष्टा करित आहेत, अभद्र शब्द बोलत आहेत, असा त्यास नेला. हें सर्व त्याणें मोठ्या दृढ मनानें सोशिलें. मग त्याचा पूर्वींचे जन्मचरितांची एक कबूलात करून तिजवर त्याची सही घेतली; आणि ती छापून राज्यभर प्रसिद्ध केली; ती लिहिली खरी, परंतु तीपासून त्या लबाडीचा पक्का निश्चय न होतां, पूर्वींपेक्षें त्याविषयीं लोकांस अधिक संशय उत्पन्न झाले; आणि त्या मुलाचा राज्याधिकाराविषयीं आजचे दिवशींही विद्वानांत विवाद आहे.

त्याणें एक दोन वेळ कैदेंतून मुक्त व्हाया करितां यत्न केला; परंतु तो सिद्धीस गेला नाहीं, आणि शेवटीं त्यास टैबर्न शहरीं फाशीं दिला; आणि त्याचे पक्षाचे

कितिएक लोकांसही तसाच मृत्यु आला.

या राजाचा राज्यांत आरंभून पर्यंत दुसरें कांहीं झालें नाहीं; परंतु कावे, खून, बंडें, लबाड्या, आणि फाशीं देणें इतकें मात्र पुष्कळ झालें. सर्वत्र हेनरी राजा लबाड्यापाही म्हणून त्याची प्रकृति निर्दय झाली होती खरी; परंतु वास्तवीक पाहिलें असतां त्याचे सारिखी स्वास्थ्याची आवड दुसरे कोणास नव्हती; आणि लोकांचे लढाईचे उद्योग मोडावे म्हणून तो प्रयत्न करीत असे, या करितां त्यांची त्यावर गैरमर्जी होती. तह्नात्याचे प्रारंभीं बहुत करून त्याची असें लिहायाची चाल असे कीं, "खिस्त जेव्हां विश्वांत अवतरला तेव्हां त्या समागमें स्वास्थ्याचें आगमन झालें; आणि तो जेव्हां गेला तेव्हां एथें तें स्वास्थ्य ठेवून गेला."

त्याचें लक्ष्य सर्वदा या दोन गोष्टीकडे

डे लागलें असे; एक, सरदार आणि धर्मपक्षी यांचा अंमल कमी करावा; आणि दुसरी लोकांस वाढवून सुदशेस आणावें. हीं दोन लक्ष्यें सिद्धीस न्यायाचा मसलतीनें त्याणें एक हुकुम प्रसिद्ध केला. तो असा कीं, सरदार लोकांस आपली स्थावर संपत्ति विकायाचा अधिकार आहे. हा नियम साधारण लोकांस फार आवडला; आणि सरदारांसही विशेष वाटला नाहीं; कारण, त्यांचे इच्छेस येईल तसा पैका उधळायास त्यांस सांपडूं लागला, आणि आपले कर्जदारांचा पैका द्यायास हा एक त्यांस उपाय झाला. त्या कायद्यापासून तोटा काय तो त्यांचे संततीचा मात्र; परंतु अशी दूरचे नाशावर दृष्टि देऊन वाईट वाटावें इतके ते लोक शाहाणे नव्हते.

तो पोपाचा आज्ञा सर्वदा मस्तकीं करून धारण करीत असे, आणि धर्मपक्षा-

चाही मान बहुत राखीत असे खरा; परंतु, पोपाची सत्ता कमी करावी या विषयीं आंतून त्याचा प्रयत्न चालिला होता. सरदारांची आणि धर्मपक्ष्यांची सत्ता या रीतीनें उणी कराया विषयीं, आणि प्रजांचें हित कराया विषयीं, तो आपलें सर्व चातुर्य खर्चित होता. वास्तविक पाहिलें असतां व्यापार धंदा वाढवाया विषयीं मात्र तो फारच प्रयत्न करी; कारण त्यांहीं करून लोक सहजच बेपर्वा होतात; आणि सत्ता व कायदे या वांचून कशाचीच खातर बाळगीत नाहींत. त्या काळाचे पूर्वीं सर्व शहरांतली वस्ती उघळच एकादे वळकट किल्ल्याचे आश्रयानें असे; त्या किल्ल्यांत कोणीतरी मोठा एक लार्ड रहात असे. तो किल्ला गरीबास आश्रय, आणि अपराध्यांस बंदिखाना होत असे. अशा ठिकाणीं कारागीर, वाणी, आणि दुकानदा-

र यांची गरज लागे; ह्मणून ते त्या किल्ल्या चे जवळ कोठे तरी वस्ती करून, त्या लार्डास आणि त्याचे सेवकांस जें लागे तें पुरवीत. त्या वेळेस चोरांचा उपद्रव फार होता; ते चोर दिवसास रानांत लपून रहात, आणि रात्रीं देश लुटीत. त्यांचे उपद्रवापासून सुटायाकरितां शेतीभाती लोकही त्या किल्ल्याचे शेजारीं आपलीं घरें बांधून रहात. तशी गावांतील लोकांस त्यापेक्षें चांगले व्यापार कराया जोगे ठिकाणीं बोलावून ते गांव हेनरी राजानें उजाड पाडिले. त्यानें आपण स्वतः तसें आचरण करून प्रजांस अल्प व्यय करायाचा, आणि कर्ज मुदती प्रमाणें चुकवून द्यायाचा उपदेश केला. त्याणें बाहेरचे राजश्रीं जितके तह केले, तितक्यांत त्या व्यापाऱ्यांचा हकाचा अगोदर कसर करून घेतला.

असे आपल्या प्रयत्नानें इंग्लंडांत

लें

ले लोक बहुत सज्ञान दशेस पावले; ते निमुटपणें करभार देतात; सरदार लोक आज्ञेंत वर्ततात; राज्यनीतिमात्र काय तो दंड करिते; शहरांतून मातबराची खातर नबाळगितां वस्ती होत्ये; व्यापार उत्तरोत्तर वृद्धिंगत होत चालिला; पक्षपाती लोक नाहींसे झाले; आणि बाहेरचे राजे इंग्लंडास भिऊन आपणाशीं तह करायास येऊं लागले; या सर्व आनंदाच्या गोष्टी पाहून, पुढें हेनरी राजास आपले शरीरांत मृत्यूचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्याचे पोटांत कांहीं वायूचा रोग होऊन तो बावन्नावे वर्षीं मृत्यु पावला.
इ० स० १५०९ त्याणें तेवीस वर्षें राज्य केलें. आल्फ्रेड राजा झाल्यापासून इंग्लंडाचे हद्दीस असा राजा पडला नव्हता. त्याणें आपल्या प्रजा सामर्थ्यवान् आणि सुखी केल्या; व त्याणें त्यांचे पूर्व वृत्तींत जो भेद पाडिला तो अशा थोडे काळींत होईल असें मनांतही येत

नाहीं

नाहीं:

# प्रकरण २३

## अष्टम हेनरी राजाची कथा

## सन १५०९ पासून १५४६ पर्यंत

पूर्वीले राजाचा पुत्र हेनरी आठवा, हा अठरावे वर्षी राज्य करूं लागला. जित-के राजे झाले तितक्यांतून या सारिख्या स-र्व गोष्टी अनुकूळ कोणास नव्हत्या. त्याचे जवळ पन्नास हजार बळकट फौज होती. त्या वेळेस फ्रान्स् देशाशीं लढाई करणें हें लोकांस फार प्रिय असे; म्हणोन त्याणें आपली फौज तिथे नेऊन तें राज्य घ्यावें अशी मसलत केली. तेव्हां फ्रान्स् दे-

शा

श ध्यायाविषयीं तोच एकटा उद्योग करीत होता असें नाहीं; स्विस* लोक पंचवीस हजार फौज घेऊन दुसरे बाजूनें त्यावर येऊन हल्ला करायाचे मसलतींत होते; तसाच स्पेन देशांतील राजा फर्दिनंद, आपले कडचे एके बाजूवर येऊन हल्ला करायाविषयीं समय प्रतीक्षा करीतच होता. फ्रेंचांचें राज्य अशा विपत्तींत कधीं पडलें नव्हतें; असें असतांहीं शत्रूंचा वेडेपणामुळें तें पुनः निर्भय झालें.

एक वेळ व्यर्थ लढाई होऊन गेल्यावर इंग्लंड आणि फ्रान्स या दोन राज्यांत तह ठरला. त्यानंतर हेनरी राजाचे पूर्वजानें कांहीं सुकर्मा करितां जें असंख्य द्रव्य मिळवून ठेविलें होतें, तें तो ख्याली खुशालींत उधळूं लागला. तो हेनरी आनंदांत

* स्विसलंड म्हणून युरोप खंडांत देश आहे, तेथील लोकांचें नाव स्विस.

वेळ घालवीत असतां वारंवार लढायाची तयारी करण्यांत त्याचा जामदारखाना रिकामा होत चालिला. त्याचे बापानें जे अमात्य त्यास मसलत सांगाया करितां नेमिले होते, ते अशी ढंगांस संमति देईनात; ह्मणोन हेनरी राजा त्यांस मसलत पुसेनासा झाला. आणि ज्याचें नाव पुढें क्यार्डिनल वुल्सी पडलें होतें, असा जो टामस त्याची बहुधा मसलत ऐकूं लागला. तो वुलसी राजा ह्मणे तें मान्य करून त्याची खुशामत करीत असे. तो एके बेरोजगारी गृहस्थाच्या मुलगा. कितिएक ह्मणतात कीं त्याचा बाप खाटकी होता, ती गोष्ट खोटी. त्यास लहानपणींच आक्सफर्डाचे सर्व विद्यालयांत पाठविला; आणि चवदावे वर्षी त्यास बांचलराची[1] पदवी मिळून झाली तेव्हां त्यास बायबांचलर[2] असें ह्मणत असत. शाळेंतू-

---

१ बाचलर ह्मणोन एक शाळेंतील पद आहे.
२. बांय ह्मणजे मुलगा.

न निघाल्यावर तो हळूहळू वाढत चालिला; शेवटीं त्याणें डार्सेटाचे मार्किसाचे मुलांस शिकविलीं, म्हणून त्याणें संतुष्ट होऊन त्यास लिमिंगतन गांवाचे धर्माध्यक्ष पदावर योजिला. त्यास त्या कामावर जाऊन फार दिवस झाले नाहीं; इतक्यांत त्याणें एके दिवशीं, मद्य पिऊन जवळ एके ठिकाणीं बाजार भरला होता, तेथें दांडगाई केली; म्हणून तेथील न्यायाधीशानें त्यास धरून केंदेंत ठेविला. अशी फजीती झाली तरी त्याचे भाग्योदयास विघ्न झालें नाहीं. पुढें सप्तम हेनरी राजाचे धर्मपक्ष्याचे स्थानीं त्यास योजिलें. त्या राजास सेवाय देशाचे मार्गारेट राणीशीं लग्न करायाचें होतें, त्या संबंधि कांहीं नाजूक काम त्यास सांगीतलें; तें त्याणें यथास्थित बजाविलें पाहून राजाची मर्जी सुप्रसन्न झाली, आणि त्याणें त्याचें शहाणपण आणि उद्योग यांची वाह

वा केली. **माक्सिमिलियन** ह्मणून राजा **ब्रूसेल** गांवांत रहात होता, तेथें कांहीं काम सांगून **हेनरीनें वुलसीस** पाठविलें; तें काम करून तो तिसरे दिवशीं परत आला, असें पाहून राजास चमत्कार वाटला; आणि त्याणें लबाडी केली असें वाटून तो त्यावर रागें भरला. मग **वुल्सीनें** त्याची खातरी केली कीं, मी तुमचा सर्व आज्ञा बजावून आतांच **ब्रूसेलाहून** आलों. त्या गोष्टीवरून त्यास **लिंकोन** शहरचे **डीनीची*** जागा मिळाली; त्या पदावर तो असतां **विंचेस्तराचा बिशप फाक्स**, याणें राजपुत्राची त्याची ओळख करून दिली; कारण त्या वेळेस त्याची कृपा **सरेचे अर्लावर** होती ती यावर झाली. पुढें त्या दरबारांत **वुलसीस** खासगीचे

---

* **डीन** ह्मणजे बिशपाखालीं ह्मणजे धर्माध्यक्षाचे खालचें पद आहे.

अमा

अमात्याचें पद मिळालें. त्या मध्यें मार्दव, शौर्य, आणि भलेपणा, हे सर्व गुण होते; ह्मणून राजाची त्यावर प्रीति बसली. राजाच्या आणि आपला स्वभाव मिळून आवा या करितां बुल्ड्सी आपला सर्व प्रयत्न खर्च करीत असे; गाई, हांसे, आणि निर्भीड नाचे; त्यास वर्षें चाळीस होतीं, आणि तो जातीचा धर्मपक्षी होता, तरी तोआपल्या वया कडे आणि अधिकारा कडे कांहींच लक्ष नदेतां यथेछ आचरण करी; आणि त्याचे सोबतीही त्याचा मान न राखितां त्याची थट्टा करीत; हेनरी सारिखे दुष्कर्मी आणि भोळे राजास हे गुण फार च आवडतात; ह्मणून बुल्ड्सी राजास परम प्रिय वाटू लागला; आणि त्याणें सगळा राज्य कारभार त्याजवळ दिला. तो राजा जवळ नीच रीतीनें वागतो, आणि आपणा जवळ मोठी प्रतिष्ठा दाखवि-

तो

ती, ही गोष्ट पाहून लोकांस मोठा संताप येई. त्या वेळेस धर्मपक्ष्यांचा दुराग्रह आणि त्यांस अयोग्य असा त्यांचा डौल हें पाहून लोकांचा मनांत पूर्वींच मत्सर आणि द्वेष उत्पन्न झाले होते; तशांत वुल्सी थोर पदास चढला पाहून लोक सर्व धर्मपक्ष्यांशीं बहुतच द्वेष करूं लागले. पुढें उत्तरोत्तर त्याचे गुण लोकांस उघड दिसून आले. त्यास द्रव्य मिळवायाची फार आस्था असे, परंतु उधळा त्यापेक्षें अधिक; बुद्धिवान मोठा. पण उतावळ भारीं; सत्तेची इछा, परंतु कीर्तिविषयीं त्यापेक्षें अधिक; एखादे वेळेस तो चावट, खुशामती आणि आग्रही असे, दुसरे वेळेस तो थोर, गोड आणि सत्ताधारी असा होई; बराबरीचांस त्रासक, परंतु आपले पेक्षें लहानांवर दयावान; लोकांवर क्रूर, परंतु मित्रांशीं उदार; उपकारी, आणि धार्मिक; असा तो सर्व कामकाजांत मुख्यपं-

णा धारण करी; परंतु तो आपला थोरपणा स्म न ठेविल्यामुळें आपलें मौर्ख्य प्रकाशित करी.

तो अकस्मात् उच्च पद पावला ह्मणून लोक त्याचा मत्सर करूं लागले. तो त्यांचे मनांतून ओंवा, या करितां त्याणें फ्रान्स देशाचा राजा प्रथम फ्रान्सिस याशीं स्नेह ठेविला. त्या राजानें बहुत प्रयत्न करून वुलसीस आपले पक्षाचा केला होता; ह्मणून वुल्सीनें हेनरी राजास भीड घातली कीं, त्याची आणि आपली एकवेळ भेट व्हावी.

हेनरी समुद्र उतरून गेला; त्याचा सन्मान कराया करितां, इंग्लिशांचे सीमेंत गीन्स् आणि आर्ड्स या दोन गावांमध्यें क्यालेइस प्रांतांत बहुत खर्च होऊन उभयतांची भेट झाली.

आपले बापाचें जें अपरिमित द्रव्य

होतें

होतें तें हेनरी राजानें व्यसनांत खर्च केलें; मग तो आपले आमदार खान्यांत भर पडायाकरितां वुल्सीची प्रार्थना करूं लागला. प्रथम त्याणें कर म्हणून लोकांकडून पुष्कळ पैका काढिला; परंतु तो पैका उत्पन्न करायास वुल्झीस कांहीं संकट पडलें. त्याणें धर्माध्यक्षांपासून बहुत पैक्याचा पुरावा केला; आणि प्रतिनिधींजवळही मागूं लागला. त्याणीं मागीतल्याचे अर्धा पैका दिला. असा त्यांचा लोभ पाहून वुल्सीस राग आला, आणि त्याणें सांगून पाठविलें कीं, मला तुमचे सभेंत येऊन बोलायाचा हुकूम व्हावा, त्यावर त्याणी उत्तर केलें कीं, ज्यांची एथें नेमणूक झाली आहे त्यावांचून दुसरे कोणास एथें बसून वाद करायाची परमाणगी नाहीं. पार्लमेंटांत जे वादविवाद होतात त्यांत मुख्य राजा, ही गोष्ट राज्यांत व्हायाविषयीं हा

प्रथमचा

प्रथमच्या यत्न. पुढें वुल्सीनें आंत प्रवेश केला; आणि तोबेत पुढें हेनरीनें लवकरच उत्तम रीतीनें सिद्धीस नेला.

या काळापर्यंत राज्यांतील सर्व कारभार वुल्सी चालवीत असे; आणि लोक येऊन फिर्यादी करीत त्या कांहीं मनास न आणितां राजा आपले अंतःपुरांत नेहमी रमत असे. परंतु या अमात्याचे सत्तेच्या नाश करणारा असा काळ पुढें आला. मोठी विलक्षण आणि उपयोगी अदलाबदल करायाकरितां त्या काळीं सिद्धता झाली होती. ही अदलाबदल म्हणजे धर्मांतर व्यवस्था. तें वर्तमान असें.

त्याकाळीं रोमन धर्मपक्षाचे दुष्कर्मांचा आणि लबाडीचा कळसवर झाला होता. त्याचे अगोदर कांहीं दिवस पुस्तकें छापण्याची युक्ति प्रसिद्ध झाली होती; तीणें

तीणें करून विद्या, कळा, कौशल्यें, यांचा प्रसार होऊन लोक त्या धर्मपक्षाची सत्ता मानितात असें झालें; त्या वेळेस दहावा लिओ पोपाचे अधिकारावर होता तो मोठ्या उत्साहानें रूम शहरांत सेंट पीटराचें देवालय बांधायाचा उद्योगास प्रवृत्त झाला होता. त्या कामास बहुत द्रव्य पाहिजे, तें त्याणें मुक्तिपत्रें विकून लोकांकडून उत्पन्न केलें. अशी गोष्ट पूर्वींही बहुत वेळ घडली होती. तें मुक्तिपत्र विकत घेईल त्यास जन्मांतरीं यातना भोगावी लागणार नाहीं, असें म्हणत; आणि एकाद्यानें जर तें आपल्या मित्रा करितां घेतलें तरी त्यास उपयोगी पडे. तीं मुक्तिपत्रें जेथें विकायास नेत, तेथें दुकानें उघडून तयार असत; परंतु मद्यशाळा, मांसगृहें, द्यूतसभा, एथें बहुधा तीं विकत मिळत. या मुक्तिपत्रांची प्रशंसा सांगावयास साक्सनी प्रांतींत आग्गुस्तिनाचे मताचें महंतांस पाठविलें

लें त्याणीं पैका आणि आबरू हीं दोनही मिळविलीं. असे ते चोरून पैका छपवितांत हें पोपाचे मंत्र्यांस समजतांच त्याणीं तें नफ्याचें काम त्यांपासून काढून डोमिनिकन मताचे महंतांचे स्वाधीन केलें. वर्टिंबर्ग शहरचे सर्व विद्यालयांतला शाळागुरु मार्तिन लुदर ह्मणून आगुस्तिन महंताचे संप्रदायाचा असे, त्यास तें मुक्तिपत्राचें काम एकापासून काढून दुसऱ्यास दिलें ही गोष्ट पाहून फार संताप आला; आणि ती त्या मुक्तिपत्राचा कांहीं उपयोग नाहीं असें लोकांस प्रसिद्ध पणें सांगूं लागला. त्याची प्रकृति तापट असे; आणि तशांत त्याला अपमानामुळें चीड आली होती, ह्मणून त्याणें प्रत्यक्ष पोपाची ही निंदा आरंभिली. त्याचे प्रतिस्पर्ध्यांनीं त्याचें कांहींच चालूं नये असें केलें; परंतु त्याणें बहुत ग्रंथ वाचून आपलें

ल्लें मत पुष्ट करायास रोमन धर्मपक्षाव-
र दुसरे कांहीं दोष शोधून काढिले. त्या
वादांत राजा हेनरी पर्यायें करून दोहोंक-
डचे पक्षांस अनुकूल झाला. त्याचे बापा-
नें त्यास सद्विद्या प्राप्त व्हाव्याकरितां धर्माचा
शाळेंत कांहीं दिवस ठेविला होता. त्या वे-
ळेस मोठमोठे विद्वानाची मुख्य विद्या काय
तीही होती. त्या शास्त्रांत आपली गति आ-
हे असें लोकांस कळवाया करितां राजानेंलु-
दराचीं पुस्तकें वाचायास पोपाची आ-
ज्ञा घेतली; कारण एव्हवीं तीं वाचली अ-
सतां जाति बहिष्कृत होतो असा त्या वेळेस
नियम होता. राजानें संटटामस आक्वि-
नसाचे पुस्तकाचे आधारावर सात* संस्का-
र स्थापिले; आणि त्या शास्त्रांत कांहीं आ-

---

* पोपाचे मतानुसारी सात संस्कार मानितात, आणि प्रातेस्तंत म्हणजे जाणीं पोपाचें मत खंडून धर्मानें स्थापिलें ते दोनच मानितात.

पली

पली प्रवीणता प्रकट केली; परंतु कितिएक असें ह्मणतात कीं, हें सगळें ग्रुल्सीचे मदतीनें झालें. असा त्वरेनें ग्रंथ करून तो पोपाचे संमति करितां रूम शहरास पाठविला. त्या ग्रंथाचें पांडित्य आणि गांभीर्य पाहून पोपानें प्रसन्न होऊन त्यास सेंट जेरोम आणि सेंट आगुस्तिन, यांचे प्रयत्नाची उपमा दिली; आणि त्याचे कर्त्यास धर्म संरक्षक असें पद दिलें. त्या पोपाचे ध्यानांत आलें नाहीं कीं, थोडेच दिवशीं ह्राच हेनरी राजा या धर्माशीं वैर करील.

स्पेन देशाचे आरागन प्रांतांतली क्याथेरीन ह्मणून राणी ती हेनरी राजाची बायको होती; तिला प्रथम आणून हेनरीचे भावानें तिशीं लग्न केलें होतें. त्या नंतर लवकरच तो मेला; तेव्हां त्या बायकोशीं राजानें लग्न केलें, या गो

ष्टी

तीस अठरा वर्षें झालीं होतीं. लोक धर्मपक्षाच्या फारमान राखीत असत खरे; परंतु तिशीं हेनरीचें लग्न झालें ही गोष्ट तो आणि लोक या दोघांसही ठीक वाटली नाहीं. त्याचे राणीचें दास्यत्व करणाऱ्या बायका होत्या त्यांत एक आना बुलिन म्हणून होती; तिचा बापाचें मोठमोठे दरबारी लोकाशीं नातें होतें, आणि तो प्रतिष्ठित होता. त्याचें नाव सर टामस बुलिन. राजानें त्यास बहुत वेळ वकिलातीचे कामावर पाठविला होता. त्याणें नार्फोकाचे डुधुकाचे मुलीशीं लग्न केलें होतें. दरबारांत जितक्या स्त्रिया होत्या त्या मध्यें त्या आनेचे बराबरीची कोणीच नव्हती. तिणें पारिस शहरांत उत्तम विद्याभ्यास केला होता; त्या मुळें तरुणीच्या सौंदर्यास विशेषच शोभा आली होती. तिचें स्वरूप स्वच्छ, भिडस्थ, आणि मोहक; तें अंमळसें ठें-

गू होतें, परंतु चांगलें; हे सर्व गुण तिचें श-
हाणपण आणि उद्योगिता यां पुढें कांहींच
नव्हत. हेनरी राजाच्या स्वभाव असा होता
कीं, मनांत कामविकार उत्पन्न झाला म्हणजे
तो आवरूं नये; म्हणून तिला पहातांच तो
अतिशय मोहित झाला. त्याणें पुढें बहु-
त यत्न केला, परंतु लग्न केल्यावांचून तिचा
उपभोग घेतां येईना. त्याणें या विघ्नाच्या चां-
गलाच प्रतीकार आरंभिला. तो असा. त्या-
ची राणी त्यास आवडेना अशी झाली हो-
ती, तिचा आपला वियोग झाला पाहिजे म्ह-
णून तो असें बोलूं लागला कीं, इतके दिव-
स मी आपले भावाचे बायकोशीं संग के-
ला या गोष्टीचा मनांत विचार करून म-
ला पश्चाताप होतो. आपण विचारांत प-
डलों आहें असें दाखवून, सातवा क्लीमें-
ट जो त्या वेळेस पोप होता; त्यास त्या-
णें विनंती केली कीं, पेशजींचे पोपानें जी

मला

मला क्याथेरिनेशीं लग्न करायास आज्ञा दिली होती, ती फिरवावी; आणि असें ह्मणावें कीं, शास्त्रानें जो अवश्य नियम सांगीतला आहे तो मोडायाची पोपासही शक्ति नाहीं. पोपाचे मनांत तसें करायाचें नव्हतें; परंतु राजाचे त्यावर उपकार होते ह्मणून तो नाहीं ह्मणायास भ्याला; आणि त्याणें प्रथम होय ह्मणावें, मग नाहीं ह्मणावें, त्यासाठीं वाद कांहीं करावा, पुनः आश्वासन द्यावें; असें आरंभिलें. त्याचा मनांत होतें कीं, धर्मसंबंधी असा विवाद जों पर्यंत चालेल तों पर्यंत राजा उतावीळ होणार नाहीं; परंतु हेनरीस कज्जाच्या अभ्यास होताच, ह्मणून त्याणें आपले मताचे किंवा मनोविकाराचे पुष्टी करणार्थ शास्त्रांतून किती एक प्रमाणें काढिलीं.

असा बहुत दिवस त्या राजाचा आणि पोपाचा विवाद चालिला; तो ठरलां

ह्मणजे

ह्मणजे राजानें सुखी व्हावें असें होतें. त्याक मांत आपले पक्षाच्या अभिमान धरून आपला स्नेही बुल्सी साहाय्य करील असें राजाचे मनांत होतें; परंतु तोही पोपाचे मतास अनुसरला. त्या बुल्सीस मोठें संकट येऊन पडलें; तें असें कीं, राजाचे आपणावर सहस्त्रशः उपकार, ह्मणून त्याची मर्जी मोडितां नये; इकडे पोपाच्या अपमान करावा तरीही कठीण; कारण तो आपला स्वामी, आणि शासन करायास समर्थ बुल्सी अतिशय हट्टी आणि भांडखोर होता खरा; परंतु त्या प्रसंगीं त्याणें पोपाच्या वकील क्यांपीजो ह्मणून होता त्याचे सांगीतल्याप्रमाणें केलें. बाहेरून निमित्त असें दाखविलें कीं, त्याची क्यानननला ह्मणून ग्रंथ आहे त्या मध्यें गति फार, ह्मणून त्याचे मतास मी मान्य झालों. हें पाहून राजास फार राग आला; परंतु चांगली संधि सांपडे तों पर्यंत तो त्याणें तसाच लपवून ठेवि-

ला

ला होता. पुढें तो राजा एकादा तसाच बु-द्धिवान् आणि लबाडी मध्यें किंचित् कमी; असा पुरुष आपले जवळ असावा ह्मणून शोध करूं लागला; इतक्यांत त्यापेक्षें शहा-णा आणि अधिक विश्वासु, असा एक टामस क्रामर ह्मणून पुरुष त्यास सहज प्राप्त झाला.

या रीतीनें बुल्सींची आज्ञा संभा-ळणारा पुरुष मिळाल्यावर तो राजा हेनरी त्या धर्माध्यक्षावर आपले कोपाची प्रेरणा करिता झाला. राज्याचा आटर्नी* जनरल होता त्यास बुल्सींचें अन्यायपत्र करायास सांगातलें; पुढें त्याजवळ

* आटर्नी जनरल ह्मणून एक कामगार असतो; त्याचा उद्योग हा कीं सरकार संबंधी न्यायांत सरकारचे पक्षाचें कागदपत्र तयार करून बोलणें बोलावें. जसा मुंबईचे कोर्टांत आड्वोकेट जनरल आहे तसा.

ची सरकारी मोहोर काढून सरटामस मोर ह्मणून होता त्याजवळ दिली. वाड्यांतून त्यास निघून जायाचा हुकुम केला; आणि त्याचे घरचीं भांडीं, सामान हें सर्व राजानें आपल्याजवळ आणविलें. त्याचे दवलतीची याद करून पाहूं लागले तों ती पराकाष्ठेची दिसली; हालंडांतले चांगले कापडाचीं त्याचे घरांत पन्नास वस्त्रें सांपडलीं, आणि त्याचे वाड्याचा भिंतीवरून सोनेरी आणि रुपेरी कापडांचे पडदे सोडिलेले पाहिले. मग त्यास सरकार गुन्हेगार ठरवून राजाचे आज्ञेवरून नर्थंबर्लंडाचे अर्लानें धरिलें; आणि तो यार्क शहरांत होता, तेथून चौकशी करितां त्यास लंडनास न्यायाची सिद्धता केली. पहिल्यानें आंग्लंग प्रधान धर्माध्यक्ष ह्मणून तो जायास कबूल होईना; परंतु पुढें त्या अर्लाचा दृढ निश्चय पाहून

न तो सिद्ध झाला; आणि लहान लहान मजला क़रीत लंडनास चालला. वाटेनें तो श्रूसबरीचे अर्लाचे घरीं पंधरा दिवस पर्यंत राहिला. तेथें एके दिवशीं जेवीत असतां तो अकस्मात दुखण्यांत पडला. लोक तर्क करितात कीं त्याणे विष खाल्लें असेल. तेथून त्यास पुढें लेसेस्तराचे मठापर्यंत नेलें. तेथें आपल्यास महंत भेटायास आले पाहून तो बोलिला, "हे मठाध्यक्षहो! मी तुमच्या मध्यें आपलें शरीर पडावें म्हणून आलों आहें." मग त्याणें आपलें आंथरूण घालायास सांगीतलें. त्याचें दुखणें एकाएकीं वाढत चालिलें पाहून त्याजवळ सेवा करितां एक चाकर ठेविला होता; त्याजपाशीं तो वुल्सी मरायाचे पूर्वीं कांहीं क्षणीं असें बोलिला; "मी तुझी प्रार्थना करितों कीं, त्या सार्वभौम राजाजवळ तूं मजपासून मजविषयीं बोल;

त्याचा स्वभाव राजा सारिखा आहे; आणि त्याचें हृदयही राजा सारिखेंच आहे. तो आपलें अर्धें राज्य घालवील, परंतु आपली मर्जी मोडणार नाहीं. मी तुला सत्य सांगतों कीं, त्याची वाईट बेत मोडावा ह्मणून मी त्याचे पुढें एक प्रहरभर गुडघे टेंकून उभा होतों; पण कांहीं साधलें नाहीं. जसी चित्त देऊन मी या राजाची सेवा केली तशी जर ईश्वराची केली असती, तर त्याणें मला ह्या तारपणीं अंतर दिलें नसतें. परंतु ईश्वराचें ध्यान सोडून राजाचे सेवे करितां इतके श्रम केले, त्यास योग्य असें फळ हें मला भोगिलें पाहिजे."

त्याला असा बहुत पश्चाताप होऊन तो पुढें लवकरच मृत्यु पावला. त्याणें आपलें जन्म लोभानें भ्रष्ट आणि हलकी सेवा करून नीच केलें.—

राजाचा धर्माशीं संबंध होता तो या

रीतीनें

रीतीनें सुटतांच त्याणें निश्चय केला कीं आतां पोपाच्ची पर्वा करायाचें कांहीं प्रयोजन नाहीं. मग त्याणें त्या आनाबुलेनेला पेंब्रोकाची मार्शनस असें पद देऊन, तिशीं चोरून लग्न केलें. त्या समारंभांत तिचा बाप, नार्फोकाचा ड्युक, आणि डाक्तर क्रामर हे मात्र होते. पुढें ती बायको गरोदर झाली; तेव्हां, त्याणें लग्न केलें अशी गोष्ट कबूल केली; आणि असा पोपाच्चा आज्ञाभंग केला हा विजय लोकांस प्रसिद्धपणें कळावा ह्मणून, राजा हेनरी आपली सुंदर बायको बरोबर घेऊन मोठा समारंभ करून सारे शहरभर मिरविला. हेनरीनें या रीतीनें रोमन धर्माचा त्याग केला खरा; परंतु दुसऱ्या कोणत्याही मतांचा स्वीकार तंव पर्यंत केला नव्हता. अद्यापि धर्माचा कोणताच संप्रदाय ठरला नव्हता, आणि जाचीं मतें

प्रसिद्ध

परस्पर विरुद्ध होतीं त्यांचींही चित्तें केव ळ उदास होऊन गेलीं होतीं; ह्मणून प्राचीन आणि नवीन धर्मव्यवस्थेचे विवादापासून कईकांचे प्राण गेले असतील, अशी गोष्ट सहज ध्यानांत येत्ये.

महंतानीं राजाशीं फार वांकडें आरंभिलें होतें, ह्मणून पुढें ते एकादा अपाय करितील तो होऊं नये, या करितां राजानें प्रयत्न आरंभिला. त्या वेळेस राज्यांत सेक्रेतारी[1] टामस क्राम्वेल होता; त्यास राजानें आज्ञा केली कीं, इंग्लंडांतले प्रांतोप्रांतीं केमीशनर[2] नेमून पाठवावे. आणि त्याणीं मठाच्या शोध करून त्यांतील लोकांचा जो आचार असे-

१ सेक्रेतारी ह्मणजे राज्यांतील कागदपत्र व चौकशी ठेवणारा चिटणिसा सारिखा कारभारी असतो तो.

२. कमीशनर ह्मणजे आज्ञा मुखत्यारी देऊन

ल तो यथास्थित येऊन सांगावा. हें काम दरबारांतील कितिएक लोकानीं पतकारिलें; त्यांचीं नावें, **लेटन, लंडन, प्रैस, केज, पीत्री** आणि **बेलसीस**. ते त्या धर्मशाळा पाहूं लागले तेव्हां त्यांस फार गोंधळ दृष्टीस पडला असें सांगतात. महंतीणीचे मठांचे मठ व्यभिचाराविषयीं प्रवृत्त; त्या कर्माविषयीं सहाय महंत; लोकांची भक्ति आणि उदारपणा अधिक वाढवायाकरितां उगीच भक्तीच्या मिषानें ठकबाजा सर्वत्र चालिल्या आहेत; आणि त्या संस्थानांतून बहुत ठिकाणीं आंतले आंत विरोध पडून पक्ष झाले आहेत. असें त्याणीं पाहिलें हें खरें किंवा खोटें असो; परंतु यावर सांगीतलेल्या दुष्कर्मांच्या त्यांवर आरोप आल्यामुळें लोकांमध्यें त्याजविष-

---

काहीं गोष्टीची चौकशी करायास मुलुखांत पाठविती त्या अमलदाराचें नाव.

यीं तिरस्कार उत्पन्न झाला.

पुढें दुसरे लोक चौकशीस पाठविले; त्याणीं येऊन नवीं नवीं अन्यायाचीं वर्तमानें सांगीतलीं; तेणें करून राजा हेनरीनें जें क्रूर कर्म आरंभिलें तें लोकांस चांगलें वाटून सिद्धीस गेलें; आणि दोन वर्षांचे आंत महंताचे स्वास्थ्या करितां नेमून दिलेला सर्व वसूल राजास मिळाला. ते सर्व मिळून सहाशें पंचेचाळीस महंत होते. त्यांतून अठावीस मुख्य महंत पार्लमेंटांतील सभासद होते. सर्व प्रांतांतल्या मिळोन नव्वद शाळा, दोन हजार तिनशें भक्तिगृहें, आणि एकशें दहा आस्पितालें म्हणजे रोगिशाळा, इतकीं मोडलीं. या सर्व संस्थानांचा वसूल मिळून एक लक्ष एकसष्ट हजार पौंड जमला. हा सगळे राज्याचे वसुलाचा सुमारें विसावे हिस्सा-

इतका होता. त्या प्रसंगीं कितिएक लोक आं-
सून फार कुरकुरूं लागले; म्हणून हेनरीनें अ-
सें केलें कीं, जे आपल्यास उपयोगी पडतील,
किंवा बिथरले असतां आवरतील, त्यांस लु-
टीचा बांटा दिला. त्याणें ती मठांतील कांहीं
संपत्ति आपले मुख्य सरदारांस दिली; कां-
हीं हलके किमतीनें विकली; आणि बाकी-
ची देऊन मनास येईल तशी दुसरी भूमि
विकत घेतली.

शेवटीं हेनरीचें मत लिहून एक नि-
यम केला; त्यापासून मनुष्यांचा बहुत ना-
श झाला म्हणून त्यास पुढें लोकानीं रक्तमत
असें नाव ठेविलें. तो नियम असा कीं जो को
णी बोलून किंवा लिहून द्रव्यांतर मत[*] अ-
सत्य म्हणेल, किंवा दोनही प्रकारचें सह-
भोजन, म्हणजे तें मद्यमांस धर्मपक्ष्यानीं आ-

---

[*] द्रव्यांतर मत म्हणजे इशुख्रिस्ताचें रक्त आ-
णि पांव हें त्याचें मांस असें जें मत तें.

णि इतर लोकांनींही अवश्य भक्षिलें पाहि-
जे, असें बोलेल; अथवा असें बोलेल कीं, ध-
र्मपक्ष्यानीं लग्न केल्यास चिंता नाहीं; किंवा
म्हणेल कीं, शरीर शुद्धीचे नवस मोडिले तर
कामास येतात; अथवा बोलेल कीं, मास* म्ह-
णून पूजा करीत असतात ती उगीच; किंवा
धर्मोपदेशाकडे पापांचा उच्चार करणें हें व्य-
र्थ असें जो बोले, त्यास पाखंडी म्हणून दंड
केला जाईल; आणि न्यायाधीशाचे मर्जी
प्रमाणें तो जाळिला किंवा फाशीं दिला जा-
ईल. त्या काळीं लोकांत दोन भेद होते; ए-
क लुदराचे मार्गाचे, आणि दुसरे पोपाचे
मताचे. आतां या हेनरीचे नियमानें आ-
णि पूर्वीचे हुकुमानें दोघांसही संकट पडलें;
आणि तेणें करून लोकांस दुःख द्यायाची एक
दुसरी वाट झाली. त्या प्रमाणें त्याचीं फळें ही

---

* मास म्हणून प्राचीन क्रिस्ती धर्मांत एक जा-
तीचें कर्म असे.

पुढें झाली. बेनान आणि बिलनी या ना-
वाचे दोघे पुरुष होते, ते पोपाचे मताशीं वि-
रुद्ध ह्मणून त्यांस जाळिले; आणि बिशप
फिशर ह्मणून होता त्याणें राजाचें प्राधा-
न्य नाहीं ह्मटलें ह्मणून त्याचा शिरछेद
केला; पुढें दुसरा एक विश्वासू आणि थोरअ-
सा सरटामस मोर ह्मणून गृहस्थ होता
त्यास मारिलें. राजाचे प्राधान्याविषयीं त्या
णें कांहीं संशयित उत्तर दिलें तितकेंच म-
नांत धरून वाईट रीतीनें त्याचा जीव घेत-
ला. त्याचे वयाचे त्रेपन्नावे वर्षी सन पंध-
राशें पंसतिसांत जुलै महिन्यामध्यें त्या
वर शासन ठरून तो मेला गेला. पोपाचे
मतावर जो त्याचा अतिशय प्रेम होता तित-
का वर्ज्य करून. बाकी पाहिलें असतां, त्या
मध्यें गुण बहूत सरस होते: त्याचें मन दृढ,
शूर, आणि यथायोग्य होतें.

अशा दुष्कर्मांत एक भयंकर गोष्ट

झाली

झाली, ती व्हायास क्रूरते वांचून कांहीं नि-मित्त नव्हतें. ती अशी. आना बुलेन ह्मणून जी राजाची राणी सांगीतली तिला धर्मांतर व्यवस्थेची फार आवड असे; ह्मणून तिचे शत्रू तिचे वरचा विश्वास नाहींसा करून तिचा घात करायाची वाट पहात होते; तसें करायास त्यांस लवकरच संधि सांपडली. तेव्हां राजाचें मन तृप्त झाल्या मुळें ती वरचें केवळ उतरलें होतें, आणि त्यास पूर्वीं कांहीं दिवसांपासून जेनसेमोर ह्मणून राणीची आश्रित असे ती मिळावी अशी इछा उत्पन्न झाली होती.

हें पाहून त्या आनेचा शत्रूनीं तीवर एक आरोप ठेविला. तो असा. नार्फोकाचे ड्युकास पोपाचे धर्माविषयीं बहुत आवड होती, ह्मणून त्याणें कितिएक शायदी पैदा करून असें शाबूद केलें कीं, राणी दरबारांतील हलके चाकरांबरोबर रमते

त्ये तिचे जार मुख्यत्वें चार असें ठरविलें. त्यांचीं नावें, राजाचे पागेंतला एक खासदार हेनरी नारिस ह्मणून होता तो, राजाचे अवळचे कामगार वेस्तन आणि ब्रेरिटन, आणि चवथाएक मार्क स्मीटन ह्मणून गवयी होता तो. मग ते नारिस, वेस्तन, ब्रेरीटन, आणि स्मीटन या च्यवघांची वेस्त्मिन्निस्तर वाड्यांत चौकशी झाली. या चौघांतून स्मीटनास मथिवला; तो असा कीं, तूं आपण राणीशीं अन्याय व्यवहार केला असें ह्मण, ह्मणजे सुटशील. परंतु जीवर त्याणें असा आरोप ठेविला, तिणें पुढें येऊन त्याचे सांगण्यावर भाषण केलें नाहीं; परंतु पुढें लवकरच बाकीचां बरोबर त्याचा शिरछेद झाला तेणें करून तिचे वरचा आरोप गेला. नारिसावर राजाची फार कृपा होती, ह्मणून त्यास सांगीतलें कीं, मी राणीशीं कुव्यव-

हार केला असें तूं कबूल हो, ह्मणजे तु-
ला क्षमा करून सोडितों; परंतु त्याणें त्या
निंद्य कर्माचा तिरस्कार करून तसें केलें
नाहीं; आणि ती राणी व आपणहीं दोघेंही
निरपराधी असें ह्मटल्या मुळें मृत्यु पावला.

सभासदांची जुरी ह्मणजे नियुक्त सभा करून राणी आणि तिचा भाऊ यांची चौकशी केली; आणि त्या दोघांकडे अशास्त्र संबंध हा अपराध ठरविला; परंतु यास कोणती साक्ष पाहिली, आणि सबबकाय सांगीतली हें कांहींच विदित नाहीं. इतकी गोष्ट मात्र लागू झाली कीं, राच्फोर्ड, कितिएक लोक जवळ असतां राणीचे पलंगावर आडवा झाला होता. तिचेवर अन्याय ठरविला त्यास दुसरा इतका शोध लागला कीं, राणी आपले कितिएक सेवकांशीं असें बोलिली होती कीं, मा-

झें हृदय कधीं राजास मास झालें नाहीं. ही तिणें राजाची निंदा केली, आणि तिणें राज्य कायदा मोडिला असें ठरविलें. जा कायद्यांत असें लिहिलें होतें कीं, राजाची, राणीची, आणि त्याचे मुलांची जो कोणी निंदा करील तो अपराधी. त्या हतभाग्य राणीस कोणी मसलत सांगीतली नसतां तिणें स्थिरमनानें आपल्यावरचा आरोप आ- याविषयीं बहुत वाद केला. तेव्हां जे जवळ तमासगीर होते, तेही तिला पाहून ती केवळ निरपराधी असें बोलूं लागले. तिचेवर जेवढे आरोप ठेविले त्या सर्वांवर तिणें सुयुक्त उत्तरें दिलीं; परंतु अशानीं राजाचे इछेस प्रतिबंध कसा होईल? म्हणोन तिजवर अपराध ठरवून शासनाचा निश्चय केला. तो असा कीं, राजाचे मर्जी प्रमाणें तिला जाळावी, किंवा तिचा शिरछेद करावा. राजाचा निश्चय टळाया क-

रितां तिणें एक दोन वेळ प्रयत्न केला, आणि सांगोन पाठविलें; "हे राजा, आपणमला हलके दशेपासून बाईसाहेब केलींत, बाईसाहेबांची कौंटेस, आणि कौंटेसेची राणी केलींत; आणि राणीपासून आतां लवकरच मी आकाशांतली भक्तीण होईन." शेवटीं कृपाकरून शासन शिरछेदावर आणिलें. तें व्हायाचे दिवशीं प्रातःकाळीं किंग्स्तोन ह्मणून त्या किल्याचा रखवाली होता, त्यास तिणें बोलावूं पाठविलें. तो बंदीशाळेंत आला तेव्हां ती बोलिली. "किंगस्तोन साहेब, माझे प्राण आज दोन प्रहर दिवसपर्यंत जायाचे नाहीं असें मी ऐकिलें, ह्मणोन मला वाईट वाटलें; कारण माझा मनांत असें होतें कीं, लवकर मरून अशो दुःखी जन्मांतून एक वेळ सुटावें." तो किल्लेदार तिला धीर देऊन बोलिला कीं, कांहीं चिंता नाहीं;

तुह्मास

तुह्मास तेव्हां विशेष दुःख व्हायाचें नाहीं. त्यावर तिणें आपला गळा दोनही हातांत धरून हंसत उत्तर दिलें. " होय मला ठाऊक आहे, कीं, शिरच्छेद करणाराच्या हात भारी जलद आहे; आणि माझी मानही बारीक आहे;" जेव्हां तिला शिरच्छेदाचे जागेजवळ नेली तेव्हां ती जवळ होते त्यांपाशीं आपले शत्रूंस अप्रिय असें कांहींच बोलिली नाहीं; कारण तिची इलिझाबेथ ह्मणून मुलगी होती तिचें आपले मागें बरें व्हावें असें तिणें मनांत आणिलें. ती त्या वेळेस इतकें मात्र ह्मणाली; " न्यायानें मला शासन ठरविलें, तेव्हांच मला कळलें कीं मी मरायाची." व ती कोणास वाईट बोलिली नाहीं, किंवा माझा न्याय खोटा केला असेंही ह्मणाली नाहीं. राजाविषयीं तिणें मनापासून देवाची प्रार्थना केली, आणि ह्मणाली, " राजा फार दयाळू आणि भला आहे; त्याणें माझेवर सर्वदा कृपादृ-

क्षि ठेविली; आतां या नंतर जर कोणाचे मनांत येईल कीं माझे अन्यायाची चौकशी करावी, तर माझी विनंती इतकीच कीं, वास्तवीक काय आहे त्याचा शोध करावा."
इंग्लंडांत कोणी चपळ आणि जलद शिरछेद करणारा मिळेना ह्मणून क्यालेइस शहरांतून एकास बोलावून आणून तिचा शिरछेद केला.

तिचेवर थोडे दिवसां पूर्वीं राजाची अत्यंत प्रीति होती, तिची अशीदशा झाली पाहूनही राजाचे निर्दय हृदयास कांहीं विकार न होतां, त्याणें दुसरेच दिवशीं जेनसेमोर ह्मणून जी पूर्वीं बायको सांगीतली, तिशीं लग्न केलें. त्याणें पार्लमेंटास हुकुम केला कीं त्या बायकोस शासन ठरविलें, तेव्हां पासून तिचा शिरछेद केला त्या वेळे पर्यंत जो काळ गेला. त्या काळचें तिज विषयींचें त्यागपत्र मला करून द्या. असा

मधल

प्रयत्न त्याणें तिची एकटी मुलगी इलि-झाबेथ तिचा असलपणा बुडवाया करि-तां केला. असेंच त्याणें क्याथेरीन राणी-ची मुलगी मेरी तिजविषयीं ही केलें हो-तें.

अशी गडबड चालिली होती तेव्हां स्मिथ्‌फील्ड * ठिकाणीं आग जळतच असे. जे कोणी पोपाचे पक्षास अनुकूळ होते, तसेंच जे लुदराचे मतास अनुसर-ले त्या दोघांवरही राजाची गैरमर्जी होती, आणि त्याचा धर्मपक्षपात्यांवर कोप होता. सर्व लोकांचे धर्म व्यवस्थेंत हेनरी राजा स्व-तः आपण वारंवार बहुत फेरफार करीत असे, त्यामुळें मनांत काय आणावें, आणि कोणत्या पद्धतीस अनुसरावें हें कोणास-च कांहीं कळेना. त्याचें मत कसेंही वि-

* स्मिथ्‌फील्ड म्हणून एक ठिकाण आहे, ते-थें त्या वेळीं अपराधी मनुष्यांस जाळीत असत.

परीत आणि असत्य असतें तरी तें लोक घ्यायास सिद्ध होते; परंतु तो नेहमी तें बदलीत असे ह्मणून पूर्वींच्या लोकांस तें कसें समजेल? टामस क्राम्वेल ह्मणून एक लोहाराचा मुलगा होता त्यास राजानें आपला मित्र केला होता (असे मूर्ख राजे नीच लोकांवर फार प्रीति करून त्यांस वाढवितात.) आणि क्रामर, जास क्यांतर्बरीचे आर्च्बिशपाचें स्थान मिळालें होतें तो, हे दोघे, धर्मांतर व्यवस्थेविषयीं फार प्रयत्न करीत होते. इकडे विंचेस्तराचा बिशप, ग्यार्डिनर आणि नार्फोकाचा ड्यूक यांचा मनांत राजास पूर्वींचे अतिभक्तींत आणावा असें होतें; परंतु त्या दोघांसही हेनरी वश झाला नाहीं. तो फार दिवस खुशामत करून घेऊन असा चढला होता कीं, सर्व लोकांचा धर्म आपले मर्जीप्रमाणें चालवावा असें तो इच्छीत असे.

पुढें

पुढें थोडेच दिवसानीं रक्तस्रावी नियमांत जें मत स्थापिलें होतें त्यास मान्य नाहीं ह्मणोन सुमारें पांचशें लोकांस केद केलें. ते क्राम्वेलाचे कृपेने मुक्त झाले. लांबर्ट ह्मणून एक पंतोजी होता तो, आणि डाक्तर बार्न्स, जाणें मुख्यत्वें लांबर्टाचा शिरछेद करण्याचा उद्योग केला होता, या दोघांवर फार गैरमर्जी झाली, आणि कांहीं चौकशी नकरितां पार्लमेंटाची संमति घेऊन त्यांस जाळिलें. तेव्हांही ते धर्मसंबंधी विचारच करीत होते. बार्न्स या बरोबर जिरार्ड आणि जेरोम यांचाही शिरछेद केला. एबेल, फेदर्स्तोन, आणि पवेल त्यांस त्याच जाग्यावर मारिलें; ते त्या वेळेस ह्मणाले कीं, मरते वेळेस अशी पाखंड्याची आमच्या योग झाला हें आह्मास शासनापेक्षें अधिक वाईट वाटलें.

ह्मजा

राजा हेनरीची बायको जेन सैमोर पूर्वीं सांगीतली ती बाळंतपणींच मेली. मग महाद्वीपांत कितिएक ठिकाणीं संधानें करून शेवटीं त्याणें क्लीव्स् शहरांत आन ह्मणून बायको होती तिशीं विवाह केला. तो असें इछीत होता कीं, त्या आपले बायकोचे संधानानें जर्मनीचे राजाशीं आपण सख्य करावें. पुढें दिवसानुदिवस त्याची त्या बायकोवर अप्रीति होत चालली; ह्मणून त्याणें अशी युक्ति केली कीं, आपली बायको आणि आपला मुख्य मंत्री क्राम्वेल या दोघांस जवळून काढून टाकावें. आपलें शेवटचें लग्न जमवून दिलें ह्मणून त्यावर त्याची गैरमर्जी होतीच तशांत त्याणें दुसरें एक कारण उपटून काढिलें. तें असें. क्याथेरीन् हावर्ड ह्मणून नार्फोकाचे ड्युकाची भाची होती, तिचेवर रा-

जासकाम झाला होता; तो काम तृप्त करायाच्या उपाय इतकाच कीं पूर्वींची आपली बायको टाकावी. तसें त्याणें केलें. इकडे नार्फोकाचे ड्युकाचें आणि क्रामराचें वांकडें होतें, तो ड्युक त्यास आपला प्रतिस्पर्धी असें मानीत आसे, म्हणून त्याच्या घात करायास ही त्यास संधी सांपडली: मग त्याणें आपले भाचीचे हातून होईल तितका प्रयत्न करून त्याचा नाश आरंभिला; आणि त्याणें कावा केला होता तो सिद्धीस गेल्यानंतर त्याणें त्यास धरायाकरितां राजाची परमाणगी घेतली.

त्याची ती विपत्ति समजतांच सर्व मैत्रानीं त्यास सोडून दिलें. क्रामरानें मात्र नाहीं. त्याणें राजास क्राम्वेला विषयीं एक पत्र लिहिलें तें असें कीं. कोणासही तसें लिहायास हिंमत झाल्या-

ची नाहीं तथापि पार्लमेंटा करवीं त्या-
वर पाखंडी आणि राजद्वेषी असा आरो-
प ठेविला आणि त्याचे तोंडून कांहींच
वाका न ऐकतां हुकुम केला कीं, राजाचे
इछेस येईल त्या प्रमाणें त्यास मारावें.
त्याचा शिरछेद केला तेव्हां तो आपले पु-
त्राकडे लक्ष देऊन आपले निरपराधीपणा
विषयीं कांहीं बोलला नाहीं; आपले पात-
का करितां आपणास असा मृत्यु दिला म्ह-
णून त्याणें ईश्वराची स्तुति केली; आणि
कबूल झाला कीं, माझ्या मनांत बहुत वेळ
धर्माविषयीं कुतर्क आले होते खरे, परंतु
आतां मी क्याथोलिक धर्मांत मरतों.

हेनरी राजाचे दुष्कर्माचा वृत्तांत
आजून संपला नाहीं. त्याणें नवें लग्न
केलें त्या मुळें तो प्रथम फार संतोष पाव-
ला; राणीचे गुणें करून अतिशय मोहि-
त झाला, आणि असें आपणास देवा-

नें खुशी केलें ह्मणून उघड चवघांत त्या विषयीं देवाची स्तुति करूं लागला; परंतु हा आनंद फार दिवस राहिला नाहीं. ती गोष्ट अशी. स्कांटलंडचे राजाशीं कांहीं मसलत करायाकरितां राजा याकींस गेला होता; तेव्हां त्याचे मागें, लासेल्स् ह्मणून कोणी एक पुरुष लंडनास येऊन क्रामरास भेटला; त्याची बहीण नार्फोकाचे विधवा डचेसेजवळ चाकरीस होती. त्या बहिणीचे सांगण्यावरून त्याणें राणीचे लबाडीचा विचित्र विचित्र गोष्टी सांगीतल्या. त्या गोष्टीविषयीं राणीची चौकशी करूं लागले, तेव्हां प्रथम तिणें नाहीं ह्मटलें, परंतु आपली साथी मंडळी फितूर झाली असें पाहून, ती कबूल झाली कीं, लग्नाचे पूर्वी या देहाकडून कांहीं दुष्कर्में घडलीं असतील तीं असोत, परंतु, लग्न झाल्यावर आपण राजा-